**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, महालक्ष्मी, ता.डहाणू, जि.ठाणे येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.१७३/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च,२०१०.

**<u>वाचा</u>** :- आयुक्त, आ.वि., नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा-१०/संभिबां/प्र.क्र.३१/का.८(२), दिनांक २६ फेब्रुवारी, २०१०.

**<u>शासन निर्णय</u>** : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, महालक्ष्मी, ता.डहाणू, जि.ठाणे येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या रु.७,०१,९९३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.५, डहाणू यांनी तपासले आहे.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम बांधकामाचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या संरक्षक भिंतीच्या रु.७,०१,९९३/- (रुपये सात लाख एक हजार नऊशे त्र्याण्णव फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

५. सदर बांधकामाचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला,

उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००३१११४२८११००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार.
उप विभागीय अभियंता, सा.बां.उप विभाग क्र.५, डहाणू.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.